**व्यवसाय प्रशिक्षण संस्था/कौशल्य चाचणी संस्थांना महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेमार्फत संलग्नता देण्यासंदर्भांत शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तांत्रिक विद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये यांना "निरिक्षण संस्था (Inspection Agency)" म्हणून दर्जा बहाल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ- २०१७/प्र.क्र.२३७/अभियान-१,**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २८ ऑगस्ट, २०१८

**वाचा :** १) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/ प्र.क्र.१२२/रोस्वरो-१, दिनांक ०२/०९/२०१५.
२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१७/ प्र.क्र.२३७/ अभियान-१, दिनांक २६/१२/२०१७.
३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक ०७/सीटीएस/MSCVT/२०१८/६४, दिनांक ३०/०१/२०१८

**प्रस्तावना :**

राज्यात कौशल्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेमार्फत (MSCVT) व्यवसाय अभ्यासक्रमांना तसेच व्यवसाय प्रशिक्षण संस्था (Vocational Training Institute) व कौशल्य चाचणी संस्था (Skill Assessment Agency) यांना संलग्नता देण्याबाबतच्या कार्यपध्दतीस या विभागाच्या दिनांक २६/०१२/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या शासन निर्णयातील कार्यपध्दतीमधील परिच्छेद ११ मध्ये महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेकडे व्यवसाय प्रशिक्षण संस्था/कौशल्य विकास संस्था म्हणून संलग्नित होवू इच्छिणाऱ्या अर्जदाराकडील पायाभूत व प्रशिक्षण सुविधांची पडताळणी निरिक्षण संस्थेमार्फत करण्याची तरतूद आहे. या अनुषंगाने शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तांत्रिक विद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये यांना "निरिक्षण संस्था (Inspection Agency)" म्हणून दर्जा बहाल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील सर्व शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तांत्रिक विद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये यांना या शासन निर्णयान्वये खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून **"निरिक्षण संस्था (Inspection Agency)"** म्हणून दर्जा बहाल करण्यात येत आहे.

i. शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तांत्रिक विद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये यांना महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेच्या अधिकृत संकेतस्थळावर नोंदणी करणे क्रमप्राप्त राहील.

ii. संगणक प्रणालीद्वारे व्यवसाय प्रशिक्षण संस्था/कौशल्य चाचणी संस्थेच्या प्रत्यक्ष निरिक्षणाकरीता निरिक्षण संस्थेची निवड केल्यानंतर संबंधित संस्थेने ऑनलाईन निरिक्षण स्विकृती (Online Acceptance of Inspection) ४८ तासांच्या आत देणे आवश्यक राहील. निरिक्षणाची संधी नाकारल्यास किंवा ४८ तासांत संमती न दर्शविल्यास निरिक्षणाकरीता अन्य संस्थेची निवड करण्यात येईल.

iii. निरिक्षण संस्थेने संगणकीय प्रणालीद्वारे ऑनलाईन निरिक्षण स्विकृती सादर करताना निरिक्षणाचा दिनांकसुध्दा निर्धारीत करणे आवश्यक राहील. सदर दिनांक हा कमाल ३० दिवसांच्या कालावधीमधील असणे आवश्यक राहील. अपरिहार्य कारणास्तव सदर कालावधीत निरिक्षण करणे अशक्य असल्यास संबंधित संस्था निरिक्षणाची स्विकृती नाकारु शकेल.

iv. अर्जदाराने ऑनलाईन अर्जामध्ये नमूद केलेली माहिती/तपशिल व अपलोड केलेल्या दस्तऐवजांची पडताळणी निरिक्षण संस्था करेल. तसेच महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेने निर्धारीत केलेल्या मानकांचे अनुषंगाने अर्जदाराकडे व्यवसाय प्रशिक्षण/कौशल्य चाचणीकरीता उपलब्ध असलेल्या पायाभूत व प्रशिक्षण सुविधांचे प्रत्यक्ष निरिक्षण करून, निरिक्षण संस्था त्या बाबतचा फोटो व अभिप्रायासह अहवाल परिषदेस निरिक्षणाच्या दिनांकापासून ४८ तासाचे आत संगणक प्रणालीद्वारे ऑनलाईन सादर करतील.

v. निरिक्षण संस्थेस किमान रूपये ५,०००/- (रूपये पाच हजार फक्त) तथापि, व्यवसायांची संख्या एकापेक्षा जास्त असल्यास प्रत्येक व्यवसायाकरिता रुपये ३,०००/- (रूपये तीन हजार फक्त) इतके मानधन अनुज्ञेय राहील. सदर मानधनामध्ये बदल करण्याचे अधिकार महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेच्या नियामक मंडळास राहतील.

२. निरिक्षण संस्थांच्या मानधनावरील खर्च महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषदेच्या बँक खात्यामध्ये जमा असलेल्या निधीतून भागविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ०१/तांशि-४, दिनांक १०/०४/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०८२९१६०६०१५७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Wasudev Gawande

Digitally signed by Gajanan Wasudev Gawande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=598b4111a7392ee0c9038cf4c426c1f9ef65d75e9ac67ec77c38a9c5895cc932, serialNumber=92cce2bddffe9d1b98d5b31109f5f81e224273580cfca2f478d921078212cf69, cn=Gajanan Wasudev Gawande
Date: 2018.08.29 16:07:46 +05'30'

**( गजानन गावंडे )**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,

३. सर्व संबंधित मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व संबंधित मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
७. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, मुंबई
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
११. आयुक्त तथा नगर संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२. सर्व विभागीय आयुक्त,
१३. सर्व जिल्हाधिकारी,
१४. आयुक्त, सर्व महानगरपालिका,
१५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६. मुख्याधिकारी, सर्व नगर परिषद/नगर पंचायती,
१७. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१९. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
२०. उपसंचालक, विभागीय मुख्यालय कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
२१. प्राचार्य, शासकीय तंत्र निकेतन/प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये
२२. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषद, मुंबई.
२३. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था/मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालये तथा कनिष्ठ महाविद्यालये.
२४. सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवड नस्ती.